**महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत प्रशिक्षण कार्यक्रमासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राजस-२०१६/प्र.क्र.३०९/५-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख : ०७ डिसेंबर, २०१६

<u>वाचा</u> : १. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ दिनांक २३/९/२०११
२. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दि.२०.४.२०१६
३. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.संकिर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.-५ दिनांक १० मे २०१६
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.प.व प्र/तांत्रिक प्रशिक्षण कार्यशाळा/२०१६ दि.१८/१०/२०१६

**<u>प्रस्तावना :</u>**

सहकार विभागांतर्गत राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, नागरी सहकारी बँका, सहकारी पतसंस्था, विविध कार्यकारी संस्था, मजुर सहकारी संस्था, पाणीपुरवठा संस्था, नोकरदार सहकारी पतसंस्था, गृहनिर्माण संस्था, सावकारी परवाने, सहकारी साखर कारखाने, कृषी उत्पन्न बाजार समित्या, खरेदी विक्री संघ अशा विविध सहकारी संस्थांचे प्रशासकीय व लेखापरीक्षण कामकाजावर नियंत्रण ठेवले जाते. महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० व नियम १९६१ मधील तरतुदीस अनुसरुन राज्यातील सहकारी संस्थांचे अवसायानासबंधी सहकार खात्यातील अधिकारी व कर्मचारी यांना अवसायनाचे कामकाज गुणवत्तापुर्वक पार पाडण्यासाठी मागील वर्षी तांत्रिक प्रशिक्षण देण्यात आले होते. त्यासाठी शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, दिनांक ०६/०२/२०१६ अन्वये सन २०१५-१६ या आर्थीक वर्षात रुपये १७.५० लाख इतका निधी प्रशिक्षणासाठी उपलब्ध करुन देण्यात आला होता.

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० व नियम १९६१, महाराष्ट्र सावकारी (नियमन) अधिनियम २०१४ इत्यादी अधिनियमांची व शासनाच्या विविध योजनांची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे, सहकारी संस्थांच्या कामाकाजावर नियंत्रण/मार्गदर्शन करणे इ.जबाबदा-या पार पाडताना विभागातील क्षेत्रिय अधिकारी व कर्मचारी यांच्या कामकाजात गुणवत्ता येण्याच्यादृष्टीने अधिकारी व कर्मचारी यांना या क्षेत्रातील कायदेविषयक सखोल तांत्रिक प्रशिक्षण देणे गरजेचे आहे. प्रशिक्षणामुळे अधिकारी व कर्मचारी यांच्या कामाच्या गुणवत्तेत वाढ होण्यास मदत होईल. या प्रशिक्षणामध्ये मुख्यालयातील व विभागातील काही अधिका-यांना मास्टर ट्रेनर म्हणून प्रशिक्षण देण्यात येवून सदर मास्टर ट्रेनर्सव्दारे जिल्हा पातळीवर अधिकारी व कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्याचे नियोजन आहे. त्यानुसार सन २०१६-२०१७ या आर्थीक वर्षासाठी खालील विषयांवर सहकार खात्यातील अधिकारी व कर्मचारी यांना तांत्रिक प्रशिक्षण देण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे.

१. अर्धन्यायिक कामकाज प्रक्रियेबाबत - कायदेविषयक बाबी (Legal aspects).
२. महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ८३/८८ चौकशी कार्यपध्दती
३. महाराष्ट्र राज्य सावकारी अधिनयम २०१४ चे कलम १६, १७ व १८ बाबतचे कामकाज.

**शासन निर्णय :**

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत सहकार आयुक्तालयाच्या अधिपत्याखालील अधिकारी/कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देण्यासाठी मुख्य लेखाशीर्ष ३४५१, सचिवालयीन आर्थिक

सेवा, उपलेखाशिर्ष ००३ सचिवालयीन आर्थिक सेवा (००) (०१) शासकीय कर्मचा-यांना प्रशिक्षण (३४५१२९०६), ५० इतर खर्च या लेखाशिर्षांतर्गत रु.२५ लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतुद करण्यात आलेली आहे. त्यापैकी आता योजनांतर्गत योजनांच्या ८०% म्हणजेच रु. २०.०० लाख (रुपये वीस लाख मात्र) इतका निधी संबंधीत विभागांना खाली नमूद केल्याप्रमाणे मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | विभागाचे नाव | मंजूर निधी (रुपये लाखात |
|---|---|---|
| १ | मुंबई | २.५० |
| २ | कोकण | २.५० |
| ३ | नाशिक | २.०० |
| ४ | पुणे | ३.०० |
| ५ | कोल्हापूर | २.०० |
| ६ | औरंगाबाद | २.०० |
| ७ | लातूर | २.०० |
| ८ | अमरावती | २.०० |
| ९ | नागपूर | २.०० |
| | एकूण | **रु. २०.००** |

या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेला रु. २०.०० लाख (रुपये वीस लाख मात्र) एवढा निधी वितरीत करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून व लेखा अधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.प्रशिक्षणासाठी वितरीत करावयाची रक्कम मुख्यलेखाशिर्ष ३४५१,सचिवालयीन अर्थिकसेवा, उपलेखाशीर्ष ००३ सचिवालयीन अर्थिकसेवा ( ००) (०१) शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (४५१२९६), ५० इतर खर्च या लेखाशीर्षाखाली खर्ची पडेल.

शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद अ नुसार या प्रकरणी माहिती खालीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| विभागास प्रदान वित्तीय अधिकार | : शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०/४/२०१६ अन्वये खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत. |
| मंजूर निधी | : रुपये २५.०० लाख |
| मागील तीन महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे | : सन २०१६-२०१७ मध्ये यापूर्वी निधी वितरीत अथवा खर्च झालेला नाही. |
| ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे, त्या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही | : या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही या लेखाशिर्षा अंतर्गत एक वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. |

| | |
|---|---|
| स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांच्याकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे | : लागू नाही. |
| वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे | : लागू नाही. |
| बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्यांची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा | : लागू नाही. |
| अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत | : लागू नाही. |
| खरेदी विषयक प्रक्रिया अद्यावत संबंधीत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेस असावा | : लागू नाही. |
| साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नांवे ECS द्वारेआहरीत करावी | : लागू नाही. |

शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६ च्या तपासणी सुचीतील अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

या शासन निर्णयान्वये मंजूर निधीचा विनियोग आणि या संदर्भातील अनुपालन अहवाल व निधी उपयोगिता प्रमाणपत्र सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सादर करावे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६ च्या परिपत्रकानुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२०८१५०७५८१००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Nitin Gaikwad

Digitally signed by Nitin Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5892c3fd8686c1921e784a3faa9888d155b03f5591ce11b21a1b5006247f6972, serialNumber=2276ac762af372d872c2f01d5bb5086166f4a6e20a1bdf9762d556a93f5d118e, cn=Nitin Gaikwad
Date: 2016.12.08 15:10:24 +05'30'

(नितीन गायकवाड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

२. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. महासंचालक, यशदा, पुणे
५. प्रधान सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
६. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
७. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. अवर सचिव/कक्ष अधिकारी (१७-स/१६-स/१२-स), स.प.व व.विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
११. निवड नस्ती (५-स).